**कायम विनाअनुदान तत्वावर परवानगी दिलेल्या व अनुदानास पात्र घोषित केलेल्या मान्यताप्राप्त खाजगी व स्वयंसेवी संस्थेच्या पार्थ सैनिकी शाळा, जालना या सैनिकी शाळेतील ५ अतिरीक्त तुकडयांवरील १० शिक्षक पदांना वाढीव २०% अनुदान मंजूर करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : ईसैशा-२०१७/प्र.क्र.११७/एसएम-६,**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २० डिसेंबर, २०२१

वाचा :- (१) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:-ईसैशा-१०९५/(२७८/९५)/माशि-७, दिनांक २६ सप्टेंबर, १९९५,
(२) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- माशाअ- २००९/५९९/०९/माशि-१, दिनांक २० जुलै, २००९,
(३) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:-माशाअ- २००९/५९९/०९/माशि-१, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११,
(४) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- संकीर्ण-२०१२/प्र.क्र.१५०/१२/माशि-१, दिनांक १६ जुलै, २०१३,
(५) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- माशामु-१५१४/प्र.क्र.१८६/एमएम-४, दिनांक १९ ऑगस्ट,२०१४,
(६) शासन निर्णय,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- प्रामाअ-२०१८/प्र.क्र.७३/एमएम-४, दिनांक ३० मे,२०१८,
(७) शासन शुध्दीपत्र,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:- माशामु-१५१४/प्र.क्र.१८६/एमएम-४, दिनांक १७ मार्च,२०१८,
(८) शासन निर्णय, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग क्रमांक:-ईसैशा-२०१७/प्र.क्र.११७/एसएम-६, दिनांक २९जून, २०२१

**प्रस्तावना :-**

१.१ राज्यातील जास्तीत जास्त विद्यार्थी राष्ट्रीय संरक्षण प्रबोधिनी (NDA) च्या स्पर्धात्मक परीक्षेत प्रविष्ट होऊन सैन्यदलात भरती व्हावेत व देशाची सेवा करावी व त्याचबरोबर शिस्तप्रिय, आत्मविश्वास पूर्ण सांघिक वृत्ती बाणवून, नेतृत्वभिमुख सैनिक शिक्षणाची सोय माध्यमिक स्तरावर उपलब्ध व्हावी यासाठी सक्षम व स्वयंसेवी संस्थांना राज्यात प्रत्येक जिल्हयात एक अशा सैनिकी शिक्षण देणा-या तीस शाळा सुरु करण्यास व या अनुषंगाने सन १९९६-९७ पासून १००% अनुदानावार सैनिकी शाळा सुरु करण्यास, शासन निर्णय, दिनांक २६ सप्टेंबर,१९९५ अन्वये मान्यता देण्यात आली आहे.

१.२ राज्यातील कायम विना अनुदान तत्वावर मान्यता दिलेल्या व कायम शब्द वगळलेल्या शासन मान्यता प्राप्त खाजगी प्राथमिक व माध्यमिक शाळांच्या मूल्यांकना संदर्भात निकष संदर्भाधीन शासन निर्णय, दिनांक १५ नोव्हेंबर, २०११ आणि दिनांक १६ जुलै, २०१३ अन्वये विहित करण्यात आले आहेत. सदर निकष पूर्ण करणाऱ्या मत्स्योदरी शिक्षण संस्था संचलित, पार्थ सैनिकी शाळा, जालना या शाळेतील इ. ६ वी ते इ. १० वी च्या प्रत्येकी १ याप्रामणे ५ अतिरिक्त तुकडयांवरील १० शिक्षक पदांना दिनांक २९.०६.२०२० रोजीच्या शासन निर्णयान्वये २०% अनुदान मंजुर करण्यात आले आहे.

१.३ दिनांक २७.१०.२०२१ रोजी झालेल्या मंत्रीमंडळ बैठकीत मत्स्योदरी शिक्षण संस्था संचलित, पार्थ सैनिकी शाळा, जालना या शाळेतील ५ अतिरीक्त तुकडयांवरील १० शिक्षक पदांना वाढीव २०% अनुदान मंजुर करण्यास मान्यता देण्यात आली आहे. या अनुषंगाने वाढीव २०% अनुदान मंजूर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय :-</u>**

मत्स्योदरी शिक्षण संस्था संचलीत पार्थ सैनिकी शाळेमधील ५ अतिरिक्त तुकडया व प्रत्येक तुकडीस २ शिक्षक या प्रमाणे १० पदांना शासनाच्या पुढील आदेशापर्यंत शैक्षणिक वर्ष सन २०२१-२२ या वर्षा पासून खालील अटी व शर्तीच्या अधीन राहून वाढीव २०% (एकूण ४०%) अनुदान मंजूर करण्यात येत आहे.

**<u>अटी व शर्ती :-</u>**

**(१)** प्रथम मंजूर केलेल्या तुकडीमध्ये ४५ पटसंख्या झाल्यावर या अतिरिक्त तुकडीमध्ये किमान पटसंख्या विहित निकषानुसार ३० असणे आवश्यक आहे.

**(२)** शिक्षकांची भरती शासनाने विहित केलेल्या आरक्षण धोरणानुसार व भरतीबाबतच्या विहित कार्यपध्दतीनुसार झाली असणे आवश्यक राहील.

**(३)** शिक्षकांच्या नियुक्तीस वैयक्तिक मान्यता असणे आवश्यक आहे.

**(४)** सदर अनुदान मंजूर असलेल्या शिक्षक पदांनाच अनुज्ञेय राहील.

**(५)** शाळेतील विद्यार्थी, शिक्षक व शिक्षकेत्तर कर्मचारी यांची उपस्थिती बायोमॅट्रीक प्रणाली द्वारे नोंदविण्यात येत असेल तरच अनुदान अनुज्ञेय राहील.

**(६)** शाळेत जिल्हा शैक्षणिक प्रणालीवरील ( यु-डायस ) क्रमांक आणि शाळेत शिकत असलेल्या विद्यार्थ्यांच्या आधारकार्ड क्रमांकाच्या आधारे विद्यार्थी संख्या ग्राहय धरण्यात येईल.

**(७)** शाळेमधील सर्व शिक्षकांचा आधारकार्ड क्रमांक व वैयक्तिक मान्यतेचे आदेश सरल प्रणालीत भरल्याशिवाय अनुदान अनुज्ञेय राहणार नाही.

(८) प्रत्यक्ष अनुदान वितरीत करण्यापूर्वी **"सरल"** प्रणालीनुसार सर्व माहितीची सत्यता पडताळणीची जबाबदारी संबंधित शिक्षणाधिकारी यांची राहील.

**(९)** सैनिकी शाळांमधील यापुढील शिक्षक भरती सेवाप्रवेशविषयक प्रचलित नियमानुसार व विहीत कार्यपध्दतीनुसार करणे बंधनकारक राहील.

३. **शासनाचा स्वेच्छाधिकार :-** कायम विना अनुदान तत्वावर मंजूर केलेल्या तुकडीचे मूल्यांकन करणे, मूल्यांकन झालेल्या तुकडीस अनुदानास पात्र घोषित करणे, तुकडीस अनुदान मंजूर करणे हा शासनाचा स्वेच्छाधिकार असून निधीच्या उपलब्धतेनुसार निकषपात्र तुकडीस शासन अनुदान लागू करेल. हे अनुदान भूतलक्षी प्रभावाने लागू होणार नाही. तसेच तुकडीस कोणत्याही शैक्षणिक वर्षात कायम विनाअनुदान तत्वावर मंजूरी दिली असली तरी, राज्याची आर्थिक स्थिती, वेळोवेळी उपलब्ध होणारी आर्थिक संसाधने, राज्याच्या गरजा व त्यांचा प्राधान्यक्रम विचारात घेवून शासन अनुदान सूत्रात बदल करेल व जेव्हा अनुदान सुरु करावयाचे असेल त्यावेळचे अनुदान सूत्र लागू राहील.

४. सदर शासन निर्णयान्वये या सैनिकी शाळांमधील तुकडयांवरील शिक्षक पदांना अनुदान मंजूर करण्यात येत असून प्रत्यक्ष अनुदान वितरणाबाबतचे आदेश स्वतंत्रपणे काढण्यात येतील.

५. सदर आदेश वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. १०५६/२०२१/व्यय-५, दिनांक २४.११.२०२१ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक क्रमांक २०२११२२०१३२२२१२९२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

Imtiyaz
Mushtaque Kazi

Digitally signed by Imtiyaz Mushtaque Kazi
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=711589caceff9b0bb07e3c6556e724501d0c5ea5c63b3146314d51ec0e87d0a6, serialNumber=77a529748c5e7c1ba7a66e81c654ba3c492fda5b29e076241db1ba213ddedf4e, cn=Imtiyaz Mushtaque Kazi
Date: 2021.12.21 12:51:04 +05'30'

**( इ. मु. काझी )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई,
२) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,
३) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव
४) मा.विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय,
५) मा. राज्यमंत्री (शालेय शिक्षण), यांचे खाजगी सचिव
१) सर्व सन्माननीय विधानसभा/विधानपरिषद सदस्य,
३) मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
७) अप्पर मुख्य सचिव (शालेय शिक्षण) यांचे स्वीय सहायक,

८) आयुक्त (शिक्षण) महाराष्ट्र राज्य५, पुणे,
९) शिक्षण संचालक (प्राथमिक/माध्यमिक व उच्च माध्यमिक) म. रा. पुणे,
१०) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
११) महालेखापाल (लेखापरिक्षा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१२) महालेखापाल (स्थानिक निकाय लेखा परिक्षा व लेखा) महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर,
१३) स्थानिक निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई,
१४) विभागीय शिक्षण उपसंचालक, औरंगाबाद
१५) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, जि. जालना
१६) कक्ष अधिकारी, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण विभाग मंत्रालय, मुंबई.
१७) वित्त विभाग कार्यासन (व्यय ५)/ नियोजन विभाग (कार्या. नियोजन १४७१) मंत्रालय, मुंबई.
१८) निवडनस्ती - एसएम-६.